जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत राबवावयाच्या योजनांबाबत (सर्वसाधारण योजना) पशुवैद्यकीय संस्थांचे बांधकाम, बळकटीकरण व आधुनिकीकरण.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. जिवायो- २०१०/प्र.क्र.२९१/पदुम- ४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १९ मार्च, २०२०

वाचा :-

१. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. जिवायो- २०१० / प्र.क्र.२९१ / पदुम- ४, दि. ३०.०८.२०१०

२. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-१९(२०) /सी.आर. ९९ / तां-१/ ११८८ / पसं-६, दि.२४.१०.२०१९

प्रस्तावना:-

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा वाचा क्र. १ येथील शासन निर्णय दिनांक ३०.०८.२०१० अन्वये जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत ज्या पशुवैद्यकीय संस्थांचे बांधकाम हाती घ्यावयाचे आहे, अशा संस्थांची नावे समाविष्ठ करण्यात आलेली आहेत. यामध्ये महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला या संस्थेचे नाव समाविष्ठ नसल्याने, या मंडळाचे नाव व सदर मंडळाच्या नियंत्रणाखालील ३ गोठीत रेत प्रयोगशाळा, २ वळू संगोपन केंद्रे तसेच ७ वळू माता प्रक्षेत्रे या संस्थांचा समावेश करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत पशुवैद्यकीय संस्थांचे बांधकाम, बळकटीकरण व आधुनिकीकरण करण्याच्या अनुषंगाने वाचा क्र. १ येथील दिनांक ३०.०८.२०१० रोजीच्या शासन निर्णयातील पृष्ठ १ येथील अ - पशुवैद्यकीय संस्थाचे बांधकाम (१) या परिच्छेदात महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला व या मंडळाच्या नियंत्रणाखालील ३ गोठीत रेत प्रयोगशाळा, २ वळू संगोपन केंद्रे तसेच ७ वळू माता प्रक्षेत्रे या संस्थांचा समावेश करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदरची मान्यता जो पर्यंत मंडळाची स्थावर मालमत्ता शासनाच्या नावे असेल तो पर्यंतच लागू राहील.

२. सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमती तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १४४ / २०२०/व्यय-२, दिनांक १८.०३.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२००३१९१८०८४२२८०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6,
serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2020.03.19 18:10:58 +05'30'

( अनूप कुमार )
शासनाचे प्रधान सचिव

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)

५. महालेखापाल (लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

६. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, अकोला

७. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला

८. निवड नस्ती (पदुम-४).